मराठवाडा प्रदेशास इतर नदी खो-यातील पाणी वळविण्याकरीता प्रस्तावित नदी वळण योजनांचा अहवाल तयार करणेकरीता अभ्यासगट स्थापन करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शुध्दीपत्रक क्र. मजनिप्रा- २०१८/३१९/(प्र.क्र.७५/२०१८)/जसं(आस्था)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १२ ऑक्टोंबर, २०१८

वाचा:-१)शा.नि. क्र. मजनिप्रा-२०१८/३१९/(प्र.क्र.७५/२०१८)/जसं(आस्था), दि.१३/८/२०१८.
२)महासंचालक, संकल्पन,प्रशिक्षण,जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता, मेरी,नाशिक, चे क्र.जा. क्र.मसं/संप्रजसंसु/मअसंसं/तां शा./१८२८/सन२०१८दि. ७/९/१८ रोजीचे पत्र

**प्रस्तावना :-**

मराठवाडा किंवा इतर तुटीच्या खो-यात विपुलतेच्या खो-यातून पाणी वळविण्यासाठी प्रवाही वळण योजना तसेच उपसा वळण योजनांचे (नदी जोड प्रकल्प) नियोजन करण्यात येत आहे. सदर योजना निधी उपलब्धतेनुसार टप्प्या टप्प्याने घेण्यासाठी सदर योजनांचे प्राधान्यक्रम ठरविणे व प्राधान्यक्रम ठरविण्यासाठी सर्वप्रथम या वळण योजनांचे मापदंड निश्चित होणे आवश्यक आहे. या कामासाठी कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांच्या अध्यक्षतेखाली व प्रत्येक महामंडळातून प्रत्येकी एक मुख्य अभियंता घेऊन दि. १३ ऑगस्ट, २०१८ रोजीच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये अभ्यासगट गठित करणेत आला आहे. संदर्भ क्र. २ च्या पत्रास अनुसरुन सदर शासन निर्णयामधील अभ्यासगटाच्या सदस्यांमध्ये व कार्यकक्षेमध्ये खालील बाबी समाविष्ट करणे शासनाच्या विचाराधीन होते. त्याकरीता शासन पुढील शुध्दीपत्रक काढत आहे.

**शुध्दीपत्रक:**

संदर्भाधीन शासन निर्णयामधील मुद्दा क्र. १) अभ्यासगटाची रचना यामध्ये अभ्यासगटाचे कामकाज अधिक कार्यक्षमतेने पार पाडण्यासाठी" **मुख्य अभिंयता, नियोजन व जलविज्ञान, जलविज्ञानभवन, नाशिक-४** " यांचा अभ्यासगटाचे सदस्य म्हणून समावेश करण्यात येत आहे.

संदर्भाधीन शासन निर्णयामधील मुद्दा क्र.२) अभ्यासगटाची कार्यकक्षा यामध्ये पुढील परिच्छेद समाविष्ट करण्यात येत आहे. " **पाणी कोणत्या खो-यात किती उपलब्ध आहे, कोणत्या खो-यात किती पाणी वळविता येईल, याचा उपखोरेनिहाय अभ्यास करून त्याची प्राथमिक व्यवहार्यता ठरवून त्यानुसार प्राधान्यक्रम ठरविणे**.”

सदर शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८१०१२१३०२५९७९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Rajnish Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2018.10.12 13:04:26 +05'30'

( र. रा. शुक्ला )
**अधीक्षक अभियंता व उपसचिव (जसं) महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई .
४. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई .
५. प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई .
६. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग,यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
७.सचिव (प्रस), जलसंपदा विभाग,यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
८. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक.
९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१०. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
११. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव.
१२. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
१३. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१४.सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.
१६. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगांव.
१७. मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, पुणे.
१८.मुख्य अभियंता,कोकण प्रदेश,मुंबई.
१९. मुख्य अभिंयता, नियोजन व जलविज्ञान, जलविज्ञानभवन, नाशिक-४
२०. अधीक्षक अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, (उसिंयो) नाशिक.
२१. सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. जसं (आस्था) कार्यासन, संग्रहार्थ.